पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य यांच्या अधिनस्त
पोलीस अधिक्षक नाशिक यांच्या कार्यक्षेत्रात "सायखेडा"
येथे नवीन पोलीस ठाणे निर्माण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र. पीओएस-०२०८/१४५/प्र.क्र.४०७/पोल-३
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक २ जुलै, २००९**

वाचा:- १) सहाय्यक पोलीस महासंचालक (नि-व-स.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-पोमसं/२६ अ/४७/नाशिक (निफाड) /१८१/२००५ दिनांक २६.१२.२००८

**प्रस्तावना:-**

निफाड तालुक्याची भौगोलिक परिस्थिती, निफाड पोलीस स्टेशनपासून त्याअंतर्गत असलेले शेवटचे गावाचे अंतर तसेच पूर परिस्थितीमध्ये गोदावरी नदी पलिकडील गावांचा तुटणारा संपर्क, नागरिकांची होणारी गैरसोय व नवीन पोलीस स्टेशन निर्मितीची मागणी ह्या बाबी विचारात घेता कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठी सायखेडा पोलीस ठाणे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय:-**

वरील प्रस्तावाचा सर्वांगिण विचार करुन " खास बाब" म्हणून सायखेडा येथे पोलीस अधिक्षक, नाशिक यांचे अधिपत्याखाली नवीन पोलीस ठाणे निर्माण करण्यास व यासाठी आवश्यक असलेले मनुष्यबळ पोलीस दलासाठी निर्माण करण्यात येत असलेल्या पदनिर्मितीच्या पुढील ४ थ्या टप्पामध्ये प्रस्तावित करुन सदर मनुष्यबळ उपलब्ध होण्याच्या व पोलीस स्टेशन इमारतीच्या बांधकामाच्या अधिन राहून निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०७०२१४११५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

प्र.मो.वानखडे

(प्र.मो. वानखडे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र नाशिक.
पोलीस अधिक्षक, नाशिक.
प्रधान महालेखाकार (लेखा परिक्षण-१) महाराष्ट्र राज्य मुबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
कक्ष अधिकारी, पोल-७ गृह विभाग, मंत्रालय, मुबई.
संगणक समन्वयक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (पोल-३)